**<u>राज्य योजना सन २०१७-१८</u>**

हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) निधी वितरीत करणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१७/प्र.क्र.१५३/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मे, २०१७.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-२२(६)/ योजना/ प्र.क्र. ४२/ ५४६/ १७-१८, दिनांक २०.०५.२०१७.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/चाबाप्र/प्र.क्र.३३/३५८/२०१७-१८, दिनांक :- २५.०५.२०१७.

**प्रस्तावना :-**

सन २०१७-१८ राज्यस्तरीय योजनेअंतर्गत हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या लेखाशिर्षांतर्गत रुपये १५००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रांन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सन २०१७-१८ करीता हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या लेखाशिर्षाअंतर्गत रु. १५००.०० लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला अहे. विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ८० % मर्यादेत निधी माहे डिसेंबर, २०१६ पर्यत खर्च करण्यास **" अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रक्लपातील मौजा पळसगांव सिंगरु या गावाचे पूनर्वसनाकरिता सादर केलेल्या रु. १५००.०० लक्षच्या प्रस्तावापैकी वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ च्या परिपत्रकानुसार व अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीच्या अनुषंगाने ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रक्लपातील मौजा पळसगांव सिंगरु या गावाचे पूनर्वसनाकरिता रु. १२००.०० लक्ष निधी खर्च करण्यास खालील अटीवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. प्रस्तावीत खर्च:- लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव संरक्षण (००) (११) हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (राज्य) (२४०६-२२४१)

या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून आणि सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

५. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

६. अभयारण्ये, राष्ट्रीय उद्याने तथा अन्य वन प्रकल्पामुळे बाधीत होणाऱ्या कुटुंबांचे पुनर्वसनासाठी निर्गमित शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी-१०१२/प्र.क्र.१२२/फ-१, दिनांक ०३.११.२०१२ व क्रमांक :- डब्ल्युएलपी/०७१४/प्र.क्र.१६७/फ-१, दि.१२/१०/२०१५ प्रमाणे पुनर्वसन प्रक्रिया करण्यात यावी.

७. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक :- १७.०४.२०१५ व क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११७३२१३३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2017.05.31 17:37:13 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, मर्यादित, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर.
६. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
७. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
८. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*******

शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१७/प्र.क्र.१५३ /फ-१, दिनांक :- ३१ मे, २०१७ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.

(रक्कम रु. लाखात)

| **अ.क्र.** | **लेखाशिर्ष २४०६-२२४१** | **अर्थसंकल्पित निधी** | **मे, २०१७** | **जून, २०१७** | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ५०-इतर खर्च | १५००.०० | ६००.०० | ६००.०० | **१२००.००** |
| | **एकूण** | **१५००.००** | **६००.००** | **६००.००** | **१२००.००** |

******